**सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी राज्य सहकारी संघ (२४२५ ०२१८) या योजनेंतर्गत धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या संस्थेस निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र: निधीवि-२०२१/प्र.क्र.५७/२२-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ मार्च, २०२२.

संदर्भ :- १) शासन निर्णय कृषी व सहकार विभाग क्र. सीटीआर-१४७२/१५०७८-सी ७, दि.६.०९.१९७२.
२) शासन निर्णय क्र: संकीर्ण २०१२/ प्र.क्र.१८/१२/पुनर्बांधणी -११/ २२-स, दि.६.११.२०१२.
३) शासन निर्णय,वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क. ४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१.
४) शासन निर्णय समक्रमांक, दिनांक१८.११.२०२१
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचे पत्र क्र.सआ-६/अंवनि /धंगाप्रसा/निधीवि./२०२२, दिनांक ३१.०१.२०२२.

प्रस्तावना :-

धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या प्रशिक्षण विद्यालयाची स्थापना १९७२ मध्ये करण्यात आलेली आहे. त्यानुसार महाराष्ट्रामध्ये दुसरे सहकार प्रशिक्षण विद्यालय नागपूर येथे सुरु करण्यात आले आहे. या प्रबंध संस्थानाचा खर्च केंद्र व राज्य शासनाने समप्रमाणात (५०:५०) करण्याचे धोरण आहे. त्याप्रमाणे राज्य शासनाकडून ५० टक्के अनुदानाच्या रक्कमेच्या अनुषंगाने मागणी क्रमांक व्ही-२, २४२५, सहकार ००३ (२) राज्य सहकारी संघ (०२)(०२) राज्य सहकारी संघ (कार्यक्रम) (२४२५०२१८) ३१- सहाय्यक अनुदाने या लेखाशीर्षाअंतर्गत निधी अर्थसंकल्पीत करण्यात येते.

सन २०२१-२०२२ या वर्षाकरीता केंद्र शासनाकडून त्यांच्या हिश्श्याचे रुपये ५८.०० लक्ष इतका निधी दिनांक ०८.१२.२०२१ पत्रान्वये उक्त प्रशिक्षण संस्थेस उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार चालू वर्षाकरिता केंद्र शासनाच्या हिश्श्यानुरुप राज्य शासनाचा समरुप हिस्सा राज्य सहकारी संघ (२४२५ ०२१८) या योजनेंतर्गत रु. ५०.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित केला होता. सदर तरतूदीमधून रु.१८.०० लक्ष इतका निधी धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या संस्थेस संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला. चालू आर्थिक वर्षासाठी उक्त लेखाशीर्षाखाली रु.२५.०० लक्ष इतक्या निधीची सुधारित अंदाजात तरतूद मंजूर केली आहे. सहकार आयुक्त व निबंधक, पुणे कार्यालयाने संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर संस्थेस उर्वरित रु. ७.०० लक्ष इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

केंद्र शासन समरुप राज्य शासनाच्या ५० टक्के हिश्यापोटी देय असणारा निधी पैकी रु.७.०० लक्ष (रुपये सात लक्ष फक्त) इतका निधी धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, नागपूर या संस्थानास याद्वारे वितरित करण्यात येत आहे.

२. उपरोक्त बाबींसाठी होणारा खर्च, सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षामध्ये मागणी क्रमांक व्ही-२, २४२५, सहकार ००३ (२) राज्य सहकारी संघ (०२) (०२) राज्य सहकारी संघ (कार्यक्रम) (२४२५०२१८) ३१- सहाय्यक अनुदाने याखाली सुधारित अंदाजात मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सध्याची शैक्षणिक क्षेत्रातील फी आकारणी पाहता संस्थानाने आपल्या उत्पन्नाचे स्रोत वाढविण्यासाठी आकारण्यात येणाऱ्या फी शुल्कामध्ये पर्याप्त स्वरुपात वाढ करण्याच्या अधीन राहून सदर उक्त निधी वितरीत करण्यात येत आहे.

४. उपरोक्त निधीचा धनादेश कोषागार कार्यालयातून काढून प्रत्यक्ष संस्थानास देण्याकरीता आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी म्हणून पुढील अधिकाऱ्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे:-

आहरण व संवितरण अधिकारी-लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे, तसेच नियंत्रक अधिकारी-अप्पर निबंधक (वसुली व नियोजन), सहकारी संस्था, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे. यांनी सदर निधी ज्या कारणासाठी मंजूर केला आहे. त्याच कारणासाठी खर्ची पडेल याची दक्षता घ्यावी व सदर संस्थेस वितरित केलेला निधी रु.७.०० लक्ष संस्थेकडून उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन पुढील आर्थिक वर्षासाठी निधीची मागणी करतेवेळी ते शासनास सादर करावे.

५. प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ३ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच अनुक्रमे नियजोन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.८२३/१४३१, दि.२८.०२.२०२२ व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१५२/२०२२/व्यय-२, दि.१७.०३.२०२२ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३२८१२५०३६२७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

RAJU KALLUJI NARPANDE

Digitally signed by RAJU KALLUJI NARPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=445c05397d3e5fac583c028b06de2a1fa2b53743e982f5c31c9f3ffb560b0c16, pseudonym=672F50E9794DD2F3940B5C83752F64C53EAD64B9, serialNumber=F8FAA195025519ECCE143F48FE16B8572D279B7779146441B412B267FB25ACD8, cn=RAJU KALLUJI NARPANDE
Date: 2022.03.28 12:52:44 +05'30'

**(राजू. क. नरपांडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई/नागपूर,
२) महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई/नागपूर,
३) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

४) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) अपर मुख्य सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७) लेखाधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८) अप्पर निबंधक, (वसुली व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९) सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरिक्षण) तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे,
११) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी संघ, पुणे,
१२) प्राचार्य, धनंजयराव गाडगीळ सहकारी प्रबंध संस्थान, आयसीएम बस स्टॉप, मिनी बायपास रोड, न्यू नंदनवन, नागपूर- ४४० ००९,
१३) कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) कार्यासन व्यय-२, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) अवर सचिव (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) निवड नस्ती, कार्यासन-२२-स.